**खाजगी व सार्वजनिक सहभागाने वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर मार्गावर रेल आधारित सार्वजनिक जलद वाहतूक राबविण्यास मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: एमयूटी-१००४/१६७१/प्र.क्र.१५८/२००४/नवि-१०**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: १९ ऑगस्ट,२००४.**

**पहा:** महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.एमएमआरडीए/एजी/एमआरटीएस/२००४, दि.२१ जून,२००४.

**प्रस्तावना:-** खाजगी व सार्वजनिक सहभागाने वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर मार्गावर रेल आधारित सार्वजनिक जलद वाहतुक व्यवस्था राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याकरिता शासनाने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती केलेली आहे. प्राधिकरणाने मुंबई मेट्रो प्रकल्पाचा बृहत आराखडा तयार करण्यासाठी दिल्ली मेट्रो महामंडळास नियुक्त केले होते. दिल्ली मेट्रो रेल महामंडळाने मुंबईकरिता तयार केलेल्या मेट्रो रेल्वेच्या बृहत योजनेचा वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर मार्ग हा अविभाज्य भाग आहे. दिल्ली मेट्रो रेल्वे महामंडळाने वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर या मार्गाला उच्चत्तम प्राधान्य दिले असून या मार्गाची शिफारस केलेली आहे. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने याबाबत शासनास सादर केलेला प्रस्ताव विचारात घेवून शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

(१) खाजगी आणि सार्वजनिक सहभागाने वर्सोवा - अंधेरी-घाटकोपर मार्गावर रेल आधारित सार्वजनिक जलद वाहतुक व्यवस्था राबविण्याच्या अंदाजित एकूण रु.११७८ कोटी खर्चाच्या प्रकल्पास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

(२) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रकल्प अमंलबजावणी संस्था म्हणून नामनिर्देशित करण्यात येत आहे.

(३) वर्सोवा -अंधेरी - घाटकोपर सार्वजनिक जलद परिवहन प्रकल्प हा महत्वाचा पायाभूत सुविधा प्रकल्प म्हणून जाहिर करण्यात येत आहे.

(४) दिल्ली मेट्रो रेल्वे प्रकल्पामध्ये केंद्र सरकार ज्या प्रकारे सहभागी झाले आहे व प्रकल्पासाठी भाग भांडवल उपलब्ध करुन दिले आहे, त्याच प्रकारे मुंबई मेट्रो प्रकल्पामध्ये सहभागी होण्यासाठी व भाग भांडवल उपलब्ध करुन देण्याची विनंती केंद्र सरकारला करण्यात यावी. तसेच प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी काही सवलती देऊन बहूपक्षीय किंवा द्विपक्षीय कराराद्वारे निधी उपलब्ध करुन देण्यासाठी केंद्र सरकारकडे पाठपुरावा करण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

(५) भारतीय ट्राम वे अधिनियम (१८८६) (बॉम्बे अमेंडमेंट अधिनियम १९४८) मधील तरतुदीनुसार प्रकल्प राबविण्याकरिता अधिसूचना निर्गमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(६) यशस्वी निविदादारास प्रकल्प उभारण्याचे काम दिल्यानंतर सदर प्रकल्पाच्या उभारणीचे काम त्याने पाच वर्षांत पूर्ण करावे व तदनंतर पुढील तीस वर्षे सदर प्रकल्प चालवून त्या प्रकल्पावर झालेला खर्च प्रकल्पामधून मिळणाऱ्या उत्पन्नातून वसूल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(७) एमआरटीएसला भूसंपादन करण्यासाठी , समभाग भांडवलासाठी तसेच प्रकल्प यशस्वी निविदाधारकाकडे हस्तांतरित करेपर्यंत प्रकल्पपूर्व कामांच्या विविध कारणांसाठी लागणारी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत उपलब्ध करण्यात येणारी रक्कम निविदाधारकांनी उभा केलेला निधी व कामाशी सांगड घालून टप्प्या टप्प्यात कसा उपलब्ध करुन द्यावा ही बाब नगर विकास विभाग निश्चित करेल व हे टप्पे निविदेत अंतर्भूत करेल.

(८) मे. कन्सलटिंग इंजिनिअरींग सर्व्हिसेस यांनी त्यांच्या अभ्यास अहवालात शिफारस केल्यानुसार व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने गठीत केलेले स्वतंत्र प्राधिकरण ठरविल त्या दरानुसार मक्तेदारास (Concessionaire) तिकीटाचे दर आकारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

१९/८/०४

**( आर. आर. जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

महाव्यवस्थापक, पश्चिम रेल्वे, मुंबई

महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, प्रियदर्शनी पार्क, नेपीयन्सी रोड, मुंबई.

महाव्यवस्थापक, बेस्ट उपक्रम, मुंबई.

अध्यक्ष, एअरपोर्ट ॲथॉरिटी ऑफ इंडिया, मुंबई.

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

पोलीस आयुक्त, मुंबई

जिल्हाधिकारी, मुंबई शहर / जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा

सहपोलीस आयुक्त (वाहतुक), मुंबई

उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

निवडनस्ती, नवि-१०.